**पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना मृग बहार सन २०२३ मधील उर्वरीत राज्य हिस्सा अनुदानाकरीता रु.६,४९,६४३/- इतकी रक्कम विमा कंपनीस अदा करण्यासाठी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धविकास व्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांक- पूरक-२०२४/प्र.क्र.२८८/११-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०७ मार्च, २०२५

वाचा -

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. फवियो-२०२१/प्र.क्र.८१/१०-अे, दि.१८.६.२०२१

२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. फवियो-२०२३/प्र.क्र.२३६/१०-अे, दि.६.११.२०२३

३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. फवियो-२०२३/प्र.क्र.२३६/१०-अे, दि.२३.२.२०२४

४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. फवियो-२०२३/प्र.क्र.२३६/१०-अे, दि.२९.३.२०२४

५) वित्त विभाग, शासन निर्णय , क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दि. २५.७.२०२४

६) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/मुसां./पुहआफपिवियो/अ.मा./२०२४/२१८८८, दि.२९.८.२०२४

प्रस्तावना -

शेतकऱ्यांच्या फळ पिकांना हवामान धोक्यापासून विमा संरक्षण दिल्यास शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य अबाधित राखण्याच्या दृष्टीने मदत व्हावी, याकरिता राज्यात प्राधान्याने पुनर्रचित हवामान आधरित फळपिक विमा योजना राबविण्यात येत आहे. विविध हवामान धोक्यांमुळे फळपीकांच्या उत्पादकतेवर विपरीत परिणाम होऊन मोठ्या प्रमाणावर उत्पादनामध्ये घट येते. पर्यायाने शेतकऱ्यांना अपेक्षित उत्पादन न मिळाल्याने आर्थिक संकटाला तोंड द्यावे लागते. या सर्व बाबींचा विचार करुन शेतकऱ्यांना फळपीक नुकसान भरपाई मिळण्यासाठी एक उपाय म्हणून पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजना राज्यात सन २०२१-२२, सन २०२२-२०२३ व सन २०२३-२४ या तीन वर्षांमध्ये मृग बहारामध्ये संत्रा, मोसंबी, डाळिंब, चिकू, पेरू. लिंबू, सिताफळ व द्राक्ष(क) या ८ फळपीकांसाठी २६ जिल्ह्यांमध्ये महसूल मंडळ हा घटक धरुन एच.डी.एफ.सी. एर्गो जनरल इन्शुरन्स कं.लि., रिलायन्स जनरल इन्शुरन्स कं.लि. व भारतीय कृषि विमा कं.लि. या तीन विमा कंपन्यांमार्फत संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे.

पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजनेत सन २०२३ मृग बहारासाठी भारतीय कृषि विमा कंपनीने मागणी केल्यानुसार, संदर्भ क्र.(६) अन्वये कृषि आयुक्तालयाने उर्वरीत राज्य हिस्सा अनुदान रक्कम रु.६,४९,६४३/- वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजने अंतर्गत मृग बहार सन २०२३-२४ मधील उर्वरीत राज्य हिस्सा अनुदानाकरीता रु.६,४९,६४३/-इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

भारतीय कृषि विमा कंपनीने सादर केलेली मागणी आणि तद्नुषंगाने संदर्भ क्र.(६) अन्वये कृषि आयुक्तालयाने केलेली शिफारस यांचा विचार करता, पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना मृग बहार सन २०२३ अंतर्गत उर्वरीत राज्य हिस्सा विमा हप्ता अनुदानापोटी रक्कम रु.६,४९,६४३/- इतका निधी योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार संबंधित विमा कंपन्यांना खालीलप्रमाणे अदा करण्यासाठी भारतीय कृषि विमा कंपनीस उपलब्ध करून देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

**मृग बहार सन २०२३**

| अ. क्र. | विमा कंपनीचे नाव | पीएमएफबीवाय पोर्टल वरील दि. २२/०८/२०२४ स्थित आकडेवारी नुसार देय असलेले राज्य हिस्सा अनुदान रक्कम रु. | यापुर्वी एकूण वितरीत राज्य हिस्सा अनुदान रक्कम रु. | पीएमएफबीवाय पोर्टलनुसार प्रलंबीत राज्य हिस्सा अनुदान रक्कम रु. (३-४) | विमा कंपनीच्या मागणी पत्रकानुसार प्रलंबीत राज्य हिस्सा अनुदान रक्कम रु. | वितरीत करण्यात येणारी उर्वरीत राज्य हिस्सा अनुदान रक्कम रु. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | एच.डी.एफ.सी. इर्गो ज.इ.कं. | १२५४२८७४५ | १२४७७९१०२ | ६४९६४३ | ३११३५९३ | ६४९६४३ |
| **एकूण** | | **१२५४२८७४५** | **१२४७७९१०२** | **६४९६४३** | **३११३५९३** | **६४९६४३** |

सदरची रक्कम मृग बहार हंगाम सन २०२३ करीता वितरीत करण्यात येत असून त्याचा वापर इतर हंगामाकरीता अनुज्ञेय असणार नाही.

२. प्रस्तुत बाबीवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करीता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा-

**मागणी क्र. डी-३ ,**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा,**
**(००) (०७) हवामान आधारित फळपीक विमा योजना राज्य हिस्सा**
**(२४०१ ९४०२) ३३-अर्थसहाय्य**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी पुनर्रचित हवामान आधारित फळपिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचना आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परिपत्रक नुसार खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६/का.१४३१, दि.२२/१/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३/२०२५/व्यय-१, दि.११/२/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०३०७१६१२२६९३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2025.03.07 16:13:33 +05'30'

**( उमेश चांदिवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (कृषि), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) कृषि संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) संचालक, लेखा व कोषगारे, मुंबई
९) सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१२) नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई
१३) वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई
१४) विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी लि., लोक चेंबर्स, मरोल मरोशी नाका, मरोल. अंधेरी(पूर्व), मुंबई - ४०० ०५९.
१५) विभागीय व्यवस्थापक, एच.डी.एफ.सी. इर्गो जनरल इन्शुरन्स कपनी लि., पहिला मजला, एचडीएफसी हाऊस, १६५-१६६ बॅकबे रिक्लॅमेशन. एच.टी. पारेख मर्ग, चर्चगेट मुंबई-४०० ०२०.
१६) निवडनस्ती(११-अे)